**महाराष्ट्रातील ग्रामपंचायत स्तरावर ग्राम कृषि विकास समितीची स्थापना करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- संकिर्ण-२०२०/प्र.क्र.८१/३-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई -४०००३२
तारीख : ०९ सप्टेंबर, २०२०

**प्रस्तावना :**

शेती व्यवसाय हा ग्रामिण भागातील अत्यंत महत्वाचा व्यवसाय आहे. ग्रामीण भागातील सर्वच अर्थव्यवस्था ही शेती व्यवसायाशी निगडीत आहे हवामानातील बदल, लहरी पर्जन्यमान, किड व रोग, सुधारीत जातीचे बियाणे उपलब्ध न होणे, अचानक शेती मालाच्या दरामध्ये घसरण इत्यादी कारणामुळे शेती मधुन शाश्वत उत्पन्न मिळेल याची खात्री देता येत नाही. यावर स्थानिक स्तरावर विचार विनिमय करुन मार्गदर्शन होणेसाठी ग्रामस्तारावर समितीची आवश्यकता आहे. या सर्व बाबींचा विचार करता ग्रामपंचायत स्तरावर लोकप्रतिनिधी, कर्मचारी व कृषितज्ञ यांचा सहभाग असलेली एक समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्याअनुषंगाने शासन आता खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

गावातील शेतीच्या सर्वांगीण विकासासाठी गावामधील नैसर्गिक साधन संपत्तीचा महत्तम विनियोग करणे, विविध योजना व प्रकल्प यामधून हाती घ्यावयाच्या कामांचा प्राधान्यक्रम निश्चित करण्यासाठी महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियमातील कलम ४९ (४) नुसार प्रत्येक ग्रामपंचायतीमध्ये ग्राम कृषिविकास समिती स्थापन करण्यात यावी. या समितीमध्ये गावातील कृषि व संलग्न क्षेत्राशी संबंधित असलेल्या किमान १२ व्यक्तींचा समावेश असेल तथापि त्यातील अर्ध्या पेक्षा कमी नाही एवढे सदस्य महिला प्रवर्गातील असतील. सदर समितीमध्ये खालीलप्रमाणे सदस्य असतील.

**ग्राम कृषि विकास समितीची रचना:**

| | | |
|---|---|---|
| १. | सरपंच | पदसिद्ध अध्यक्ष |
| २. | उपसरपंच | पदसिद्ध सदस्य |
| ३. | ग्रामपंचायत सदस्य (महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियमातील कलम ४९ (४अ व ब प्रमाणे) | सदस्य |
| ४. | प्रगतिशील शेतकरी (तीन पैकी किमान एक महिला सदस्य) | सदस्य |
| ५. | विविध कार्यकारी सहकारी संस्थेचे अध्यक्ष (एक) | सदस्य |
| ६. | शेतकरी उत्पादक कंपनी/ शेतकरी गट यांचे प्रतिनिधी (एक) | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ७. | महिला बचत गट प्रतिनिधी(एक) | सदस्य |
| ८. | कृषि पुरक व्यवसायिक शेतकरी (दोन) | सदस्य |
| ९. | तलाठी | सदस्य |
| १०. | कृषि सहाय्यक | सह सचिव |
| ११. | ग्राम सेवक / ग्राम विकास अधिकारी | सदस्य सचिव |

**ग्राम कृषि विकास समितीची कार्ये :**

१. ग्रामसेवक यांनी कृषि सहाय्यकांच्या समन्वयाने समितीच्या बैठकीचे आयोजन करावे, कामकाज करावे.
२. सदर समितीची सभा ही प्रत्येक महिन्यातून किमान एकदा होईल
३. शासनाच्या कृषि विषयक सर्व योजना ग्रामपंचायत क्षेत्रामध्ये प्रभावीपणे राबविण्यासाठी प्रसार व प्रचार करणे, योजनांचा नियमितपणे आढावा घेऊन योजना लोकांपर्यंत पोहोचविण्यासाठी प्रयत्न करणे.
४. स्थानिक स्तरावरील हवामान, पाऊस, पाण्याची उपलब्धता, जमिनीचा पोत इ. बाबी लक्षात घेऊन ग्रामपंचायत क्षेत्रामध्ये विविध प्रकारच्या पिक लागवडी संबंधी नियोजन करणे व शेतकऱ्यांना मार्गदर्शन करणे.
५. कार्यक्षेत्रातील जलसंधारणाच्या मर्यादा लक्षात घेऊन कमी पर्जन्यमान असलेल्या ठिकाणी दर्जेदार पिक उत्पादन कसे घेता येईल या बाबतीत समिती काम करेल व शेतकऱ्यांना मार्गदर्शन करेल.
६. आधुनिक तंत्रज्ञान, बियाणे,खते, व इतर कृषि निविष्ठा, एकात्मिक कीड नियंत्रण, एकात्मिक पोषण व्यवस्थापन, यांत्रिकीकरण, संरक्षित शेती, फळबाग लागवड या विषयांवर मार्गदर्शन करणे.
७. शेतीचे पूरक व्यवसाय दुग्धव्यवसाय, कुक्कुटपालन, शेळीपालन, रेशीम लागवड इ. शेतीपूरक व्यवसायाबाबत मार्गदर्शन करणेसाठी या समितीने विशेष निमंत्रीत म्हणून प्रसंगानुसार संबंधित विभागाचे अधिकाऱ्यांना बोलावणे व त्यांनी उपस्थित राहुन मार्गदर्शन करणे त्यांच्यावर बंधनकारक असेल.
८. पिक काढणी तंत्रज्ञान व विक्रीसाठी बाजारपेठा याबाबत मार्गदर्शन करणे.
९. शेतीसाठी होणारा कर्जपुरवठा, त्यासाठी असणाऱ्या बँका, सहकारी संस्था इत्यादी बाबत शेतकऱ्यांना माहिती देणे व कर्ज सुलभतेने मिळण्याबाबत व परतफेड करण्यासाठी समन्वय साधणे. (यासाठी संबंधित यंत्रणेच्या अधिकाऱ्यांनी मार्गदर्शन करणेसाठी उपस्थित रहावे.)
१०. स्थानिक परीस्थितीन्वये उद्भवनारे प्रासंगिक कृषि विषयक समस्यांवर उपाययोजनेसाठी विचार विनिमय करणे व कृषि विभागाच्या मदतीने कार्यवाही करणे.

तालुका पातळीवरील पंचायत समिती विस्तार अधिकारी (कृषि) व कृषि अधिकारी (पंस), कृषि पर्यवेक्षक, मंडळ कृषि अधिकारी तसेच तालुका कृषि अधिकारी अधिनस्त कार्यक्षेत्रातील सर्व क्षेत्रिय अधिकारी हे प्रत्येक महिन्यात किमान तीन कृषिविकास समितीच्या बैठकांना उपस्थित राहतील. या सर्व अधिकाऱ्यांच्या दैनंदिनी मंजूर करण्यासाठी ही बाब अनिवार्य असेल याची सर्व सनियंत्रण अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी. तसेच कृषि विभाग व इतर ग्रामविकास क्षेत्रातील उपलब्ध मनुष्यबळ या कामी उपयोगात आणावे.

ग्राम कृषि विकास समितीची मुदत ही ग्राम पंचायतीच्या मुदती इतकीच असेल तसेच नवीन ग्राम पंचायत गठीत झाल्यापासून ४५ दिवसाच्या आत ग्राम कृषि विकास समिती संबंधित ग्रामपंचायतीत गठीत करण्यात येईल.पदसिध्द सदस्याशिवाय इतर सदस्यांची नियुक्ती ग्रामसभेच्या मान्यतेने करावी, पदसिध्द तांत्रीक सदस्य व निमंत्रितास मतदानाचा अधिकार असणार नाही. समितीच्या अध्यक्षांचा कालावधी हा त्यांच्या सरपंच पदाच्या कालावधी एवढा राहिल तसेच ग्रामसमितीचे सदस्य यांचा कालावधीही त्यांच्या सदस्यपदाच्या कालावधी एवढाच राहिल.नवीन ग्रामपंचायत गठीत झाल्यावर आधीच्या समितीचे सदस्य म्हणून कार्य केलेल्या व्यक्ती समितीच्या सदस्यपदी निवडण्यास पात्र ठरत असतील तर त्यांची पुर्ननियुक्ती करता येईल.

महाराष्ट्र ग्रामपंचायत अधिनियम कलम ४९ (४) अंतर्गत ग्रामसभेने समिती स्थापन करण्याची कार्यवाही करावी. ग्राम विकास समित्यांच्या संबंधातील तरतुदी या समितीस देखील लागू राहतील.

सदर आदेश ग्रामविकास विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ११/अमुसग्रा, दि.८.६.२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९०९१६२६३८८५०१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2020.09.09 16:27:36 +05'30'

**(अशोक आत्राम)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१ मा. मुख्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२ मा. मंत्री (ग्राम विकास), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३ मा. मंत्री (कृषि), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४ मा. राज्य मंत्री (कृषि), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

५ मा. राज्य मंत्री (ग्राम विकास), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६ मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
७ अपर मुख्य सचिव, (ग्राम विकास), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८ सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
९ सर्व विभागीय आयुक्त
१० आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
११ सर्व जिल्हाधिकारी
१२ सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१३ सर्व जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी
१४ सर्व गट विकास अधिकारी
१५ सर्व तालुका कृषि अधिकारी
१६ कार्यासन ७-अे, कृषि व पदुम विभाग, मुंबई
१७ कार्यासन ३-अे, कृषि व पुदम विभाग, मुंबई